**नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन कक्ष क्र.३३ व क्र.३४ मध्ये बाल न्यायालय कार्यान्वित करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण ०६१८/प्र.क्र.१२२/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ ऑगस्ट, २०१८

वाचा : १. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.B(W) ६००१/१९९०/३१३४/२९०१४/१६, दि.१५/१२/२०१६
२. नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.देखभाल विभाग/पी.जे./२५९३/२०१६, दि.१४/१०/२०१६

प्रस्तावना :

मा. उच्च न्यायालय मुंबई यांच्या संदर्भीय क्र.१ च्या पत्रान्वये नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन कक्ष क्र.३३ व क्र.३४ मध्ये बाल न्यायालय कार्यान्वित करणेसाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावातील अंदाजपत्रके उप अभियंता, दक्षिण उपविभाग, मुंबई यांनी तयार केली असुन संबंधित कार्यकारी अभियंता तसेच प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांनी सांक्षाकीत केली आहे. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर अंदाजपत्रक तपासून प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविली आहे. त्यानुसार नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन कक्ष क्र.३३ व क्र.३४ मध्ये बाल न्यायालय कार्यान्वित करणेबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन कक्ष क्र.३३ व क्र.३४ मध्ये बाल न्यायालय कार्यान्वित करण्यासाठी येणाऱ्या अनुक्रमे रु.३५,१७,२९२/- व रु.१८,३४,७८८/- अशा एकूण रु.५३,५२,०८०/- (एकूण अक्षरी रु. त्रेपन्न लाख बावन्न हजार ऐंशी फक्त ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकांस खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | कामाचे स्वरुप | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) | सा.बां.विभागाने परिगणित केलेली रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | Addition and Alternation to Court No.33 | ३५,४५,५०९ | ३५,१७,२९२ |
| २ | Addition and Alternation to Court No.34 | १८,४३,३८१ | १८,३४,७८८ |
| एकूण | | **५३,८८,८९०** | **५३,५२,०८०** |

सदर प्रकरणी नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन कक्ष क्र.३३ व क्र.३४ मध्ये बाल न्यायालय कार्यान्वित करण्यासाठी येणारा खर्च मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान, १०५ दिवाणी व सत्र न्यायालये, (०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश, (०१) (०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश (अनिवार्य) (२०१४ ०१६३) या लेखाशीर्षामधील "२७ लहान बांधकामे" या उद्दीष्टामधुन आवश्यक निधी पुर्नविनियोजनाने / पुरवणी मागणी द्वारे उपलब्ध करुन भागवावा.

प्रस्तुत शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३३४/इमा.२ दि.२/७/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला,उपविभाग-तीन, अनुक्रमांक ४,परिच्छेद क्र.२७(२)(अ) मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८२४१२४०५१४११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.08.24 12:44:34 +05'30'

**( सं.सं.नवगिरे )**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) प्रबंधक (निरिक्षणे २), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
२) प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
८) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,
९) विधि व न्याय विभाग (का./२३), मंत्रालय, मुंबई,
१०) निवडनस्ती.